**अधिस्वीकृती पत्रिका मिळण्यासाठी प्राप्त झालेले**
**अर्ज व अपील अर्ज यावरील कार्यवाहीबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र.अधिस्वी-२००५/१२४/प्र.क्र.८४/०५/३४**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांकः- १६ सप्टेंबर, २००५**

**वाचा:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.अधिस्वी-२००४/ १५१/प्र.क्र.५५/०४/३४, दिनांक ३ जानेवारी, २००५**
**२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.अधिस्वी-२००५/ प्र.क्र.८/०५/३४, दिनांक १४ फेब्रुवारी, २००५**

महाराष्ट्र राज्य वृत्तपत्र व प्रसार माध्यम अधिस्वीकृती समिती व सर्व विभागीय समित्या संदर्भाधीन क्र.१ वरील शासन निर्णयान्वये बरखास्त करण्यात आल्या आहेत. तसेच संदर्भाधीन क्र.२ वरील शासन निर्णयानुसार सन २००५-२००६ करिता अधिस्वीकृती पत्रिकांचे नूतनीकरण करण्यात आले आहे.

**शासन निर्णय:-**

सुधारित अधिस्वीकृती नियमावली (शासन निर्णय दि.१.१.२००२ व दि.११.१.२००३) नियम ४ (७), नियम ६ (३) व नियम ६ (५) अन्वये महाराष्ट्रातील वृत्तपत्रे व प्रसार माध्यम संस्थांच्या प्रतिनिधींना अधिस्वीकृती पत्रिका देण्यासाठी प्राप्त झालेले अर्ज, तात्पुरती अधिस्वीकृती पत्रिका दिलेले अर्ज, विभागीय आणि राज्य अधिस्वीकृती समित्यांच्या बैठकीपुढे निर्णयार्थ ठेवण्यात येत होते. तसेच उक्त नियमावलीच्या नियम १३ अन्वये करण्यात आलेल्या अपील अर्जांची सुनावणी मा.महासंचालक (माहिती व जनसंपर्क), राज्य अधिस्वीकृती समितीचे अध्यक्ष आणि सदस्य सचिव यांच्या त्रिसदस्यीय समितीसमोर होऊन अंतिम निर्णय घेण्यात येत होता. सध्या अधिस्वीकृती समिती अस्तित्वात नाही व नवीन समितीचे पुनर्गठन होण्यास काही कालावधी लागणार आहे. त्यामुळे अधिस्वीकृती पत्रिकांचे नवीन अर्ज, तात्पुरती अधिस्वीकृती पत्रिका दिलेले अर्ज व अपील अर्ज यावरील कार्यवाही शासनस्तरावर करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

नवीन अधिस्वीकृती समिती पुनर्गठीत होईपर्यंत, अधिस्वीकृती पत्रिका अर्जांच्या संदर्भातील कार्यवाही खालीलप्रमाणे करण्यात येईल.

१) अधिस्वीकृती पत्रिका मिळण्यासाठी प्राप्त झालेले नवीन अर्ज व तात्पुरती अधिस्वीकृती पत्रिका दिलेले अर्ज, ज्या पध्दतीने विभागीय आणि राज्य अधिस्वीकृती समित्यांच्या बैठकीत तपासले जात होते, त्याच पध्दतीने सदर अर्ज विभागीय अधिका-यांच्या बैठकीत (संबंधित विभागातील जिल्हा

KAMBALE DYAPAN-1 (कृ.मा.प.)

माहिती अधिकारी व विभागीय संचालक / उपसंचालक) व राज्यस्तरीय अधिका-यांच्या बैठकीत (विभागीय संचालक / उपसंचालक व मुख्यालय (मा.व ज.) येथील अधिकारी) तपासण्यात येऊन त्यावर योग्य ते निर्णय घेण्यात येतील.

२) अधिस्वीकृती समितीच्या अनुपस्थितीच्या कालावधीत प्राप्त झालेल्या अपील अर्जांवरील सुनावणीसाठी, मा.महासंचालक (मा.व ज.) विभागवार बैठका घेऊन अंतिम निर्णय घेतील.

३) पुढील अधिस्वीकृती समिती अस्तित्वात येईपर्यंत, नवीन अर्जावर व अपील प्रकरणी अंतीम निर्णय घेण्याचे सर्व अधिकार मा.महासंचालक (मा.व ज.) यांना असतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(प्र.बा.मंगी)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.राज्यमंत्री (माहिती व जनसंपर्क) यांचे खाजगी सचिव
सचिव, माहिती व जनसंपर्क, ,मंत्रालय, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय, मुंबई,
महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क), मुंबई
संचालक (माहिती), औरंगाबाद/नागपूर
उपसंचालक (वृत्त), मुंबई
विभागीय उपसंचालक (माहिती), कोकण विभाग, नवी मुंबई/पुणे/नाशिक/
अमरावती/नागपूर/औरंगाबाद/लातूर
सर्व जिल्हा माहिती अधिकारी,
पुणे/नागपूर/औरंगाबाद येथील माहिती केंद्राचे प्रभारी जिल्हा माहिती अधिकारी,
सर्व उपमाहिती कार्यालये
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभाग/व्यय-४
निवड नस्ती.